प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा सर्वसाधारण प्रवर्गाचा सन २०१९-२० चा अखर्चित निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०५१९/प्र.क.५३/१४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख : ११ जून, २०२०

**संदर्भ:-**

१. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग भारत सरकार यांचे पत्र क्र.७-३/२०२०- आरएफएस-III, दि.१५ एप्रिल, २०२०.

२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जाक्र/कृआ/फलो-४/पुनर्जिवित निधी/२९६/ २०१९, दि.१५ एपिल, २०२०.

**प्रस्तावना**

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची राज्यात सन २०१५-१६ पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. या घटकांतर्गत केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. सदर घटकाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सन २०१९-२० या वर्षात रु.३२५ कोटी एवढा केंद्र हिश्श्याचा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी दि. १ एप्रिल, २०२० रोजी अखर्चित असलेला निधी सन २०२०-२१ या वर्षात खर्च करण्यास, केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.१५ एप्रिल, २०२० च्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे.

सन २०१९-२० या वर्षात उपलब्ध झालेल्या केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गाच्या रु.११८.९९ कोटी एवढया रकमेचा समावेश आहे. सदर निधी शासन कोषागारात जमा आहे. वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनूसार सदर निधीपैकी रु.६० कोटी व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.४० कोटी असा एकूण रु.१०० कोटी निधी आयुक्त, कृषी यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

१. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा सन २०१९-२० या वर्षातील, केंद्र हिश्श्याचा सर्वसाधारण प्रवर्गाचा अखर्चित निधी रु. ६० कोटी (अक्षरी रुपये साठ कोटी फक्त) व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु. ४० कोटी (अक्षरी रुपये चाळीस कोटी फक्त) असा एकुण रु.१०० कोटी (अक्षरी रुपये शंभर कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी वापरण्यात यावा व निधी शिल्लक राहिल्यास चालू आर्थिक वर्षात नवीन प्रकरणे स्विकारण्यासाठीचा प्रस्ताव स्वतंत्रपणे शासनास सादर करण्यात यावा.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षाखालील चालु वर्षाच्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ २५०४) ३३, अर्थसहाय्य. | मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ ए९९६) ३३, अर्थसहाय्य. |

४. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

५. सदर योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे-:

| अ.क्र | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ- ८३/२०२०/व्यय-१, दि. ८ जून, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्या येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१११११२४४४४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Chandrakant
Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1be e0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cff d3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.06.11 12:57:24 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे
३. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
६. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
७. सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हा परिषद)
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग (का-१४३१)/मंत्रालय, मुंबई-३२
१३. वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ )/ मंत्रालय, मुंबई-३२
१४. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१५. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१६. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)